अनंत भावे

# हसो हसो



मुखपृष्ठ रेखाटन मांडणी
साईनाथ रावराणे

अक्षर प्रकाशन



## हसो - हसो

हसो हसो-
तुमच्या गावामध्ये रडणे नसो नसो

हसो हसो-
तुमच्या शाळेमध्ये रडणे नसो नसो
हसो हसो-
तुमच्या खेळामध्ये रडणे नसो नसो

हसो हसो-
तुमच्या घरामध्ये रडणे नसो नसो
हसो हसो-
तुमच्या दारामध्ये रडणे नसो नसो

हसो हसो-
तुमच्या डोळ्यांमध्ये रडणे नसो नसो
हसो हसो-
तुमच्या ओठांमध्ये रडणे नसो नसो

हसो हसो-
तुमच्या नावामध्ये रडणे नसो नसो
हसो हसो-
तुमच्या गावामध्ये रडणे नसो नसो

## रडोबांच्या -

रडोबांच्या कानांमध्ये
जमा होईल मेण -
रडोबांच्या पाया लागे
इथे-तिथे शेण

रडोबांच्या घशामध्ये
अडकुन राहील घास -
रडोबांच्या छातीमध्ये
कोंडुन राहील श्वास

रडोबांच्या डोळ्यांमध्ये
जमेल गिर्बिट धुके -
रडोबांच्या ओठांमध्ये
बोलणे होईल मुके

रडोबांच्या तोंडाने
वाजणार नाही शिट्टी -
रडोबांच्या शाळेत नाही
दिवाळीची सुट्टी!



## उगाच रडणारा

उगाच रडणाऱ्याचा-
बसतो घसा - बसतो घसा
उगाच रडणाऱ्याचा-
पुसतो ठसा - पुसतो ठसा

उगाच रडणाऱ्याला-
लागते ठेच - लागते ठेच
उगाच रडणाऱ्याला-
पडतो पेच - पडतो पेच

उगाच रडणाऱ्याची-
नरम हड्डी - नरम हड्डी
उगाच रडणाऱ्याची-
ओली चड्डी - ओली चड्डी

उगाच रडणाऱ्याची-
तुटते नाडी - तुटते नाडी
उगाच रडणाऱ्याची-
विझते काडी - विझते काडी

उगाच रडणाऱ्याची-
गळती पिसे - गळती पिसे
उगाच रडणाऱ्याचे-
होते हसे - होते हसे

## सगळे संपले - सगळे उरले

रडणारा म्हणतो
सऽगळे संपले- - - -
आता फक्त
रडणे बाकी उरले...
...म्हणजे खरोखरच
सऽगळे -सऽगळे संपले

हसणारा म्हणतो
सऽगळे कुठे संपले ?
अजून आहे-
हसणे बाकी उरले!...
...म्हणजे खरोखर
सगळेच उरले, सगळेच उरले!!



## एकच इलाज

रडणाऱ्यांच्या झाडाला
येतात काटे - काटे
रडणाऱ्यांच्या मेंदूचे
झिजतात आटे - आटे

रडणाऱ्यांच्या पायांना
येतात मुंग्या - मुंग्या
रडणाऱ्यांच्या कानांशी
भुणभुण भुंगे - भुंग्या

रडणाऱ्यांच्या अंगाला
खाज सुटते खाज
सगळ्यावरती हसणे हा-
एकच आहे इलाज!





## लाडू मोतीचूर

आज्जीबायने
लाडू केले मोतीचूर - मोतीचूर

म्हणति आजोब्बा
खाणाराहे भऽरपूर - भऽरपूर

लाडू बत्तीस
आज्जोबांनी खाल्ले - खाल्ले
लाडू खाऊन
तोंड धुवायला ऊठले - ऊठले

जेव्हा त्यांनी
तोंडात घातला हाऽत-हाऽत
कळले त्यांना
पडले सगळे दाऽत-दाऽत

आज्जीबायने
लाडू केले मोतीचूर-मोतीचूर

आज्जोबांनी
लाडू खाल्ले दातीचूर-दातीचूर

## अश्शी सुट्टी सुरेख बाई

अश्शी सुट्टी सुरेख बाई
हिरवळ दाटे चोहीकडे

वह्या-पुस्तके - दप्तरबिप्तर
नाही आठवत कुठे पडे

अश्शी सुट्टी सुरेख बाई
सूर्यच उशिराने उठतो

डोळे उघडुन बघते मी, तर
''चल गप्पा मारू,'' म्हणतो!



अश्शी सुट्टी सुरेख बाई
चंगळ होते खाण्याची
सुस्ती येता होऊन जाते
टंगळमंगळ कामाची.

अश्शी सुट्टी सुरेख बाई
हवेत ये गंमतजंमत
किती खेळलो तरी आपले
हात-पाय नाही दमत-थकत

अश्शी सुट्टी सुरेख बाई
पंख फड्‌फड्‌त उडून जाते
माझ्या हाती आठवणींची
रंगित रंगित पिसे ठेवते!

## नक्को नक्को

नक्को नक्को नक्कोच्या
डोळ्यांत गढूळ पाणी
आणि त्याच्या तोंडामध्ये
खारटतुरट गाणी

नक्को नक्को नक्कोच्या
पायांत घट्ट गोळे
हात म्हणजे धुण्याचे
ओले गिच्च पिळे

नक्को नक्को नक्कोचे
नाक सदा वऽऽर
चिडक्या - किडक्या आठ्यांचे
जाळे कपाळावर

नक्को नक्को नक्कोची
अडून बसते गाडी
नक्को नक्को नक्कोची
उलटी होते शिडी



## धडपडे - धडपडे - धडपडे

धडपडे - धडपडे
धडपडे
करू जाता काही - सारे उडे, पडे, सांडे
धडपडे - धडपडे - धडपडे

धडपडे पिऊ गेले चहा
चहा पिताना धडपड अशी-
चहा सांडला अंगावर, नी
फुटलीच कपबशी

धडपडे झोपू गेले खुशीत
झोपेमध्ये धडपड अशी-
गादी गेली बाजूला, नी
पायात आली उशी.

धडपडे करू गेले दाढी
दाढी करायची धडपड अशी-
जखमा झाल्या सतरा, नी
छाटली अर्धी मिशी




मिर्ची खाल्ली मिर्ची खाल्ली
मिर्ची खाल्ली--
जणू जिभेला
गांधिलमाशी चावली

दिसली गार गार गार
हिरवी आणि छान्दार
म्हणुन झटकन उचलुन
तोंडात टाकली
जणू जिभेला
गांधिलमाशी चावली

हाय हाय हाय हाय
उपाय करू काय काय ?
ओरडत, हातपाय हापटत
बोंब ठोकली
जणू जिभेला
गांधिलमाशी चावली

पाणी प्यालो - आग विझेना
साखर खाल्ली - आग विझेना
म्हणून भडकुन, गप्‌कन पकडुन
गांधिलमाशीच खाल्ली
जणू जिभेला
हिरवी मिर्ची चावली.

मिर्ची खाल्ली -- माशी चावली
माशी खाल्ली -- मिर्ची चावली
मिर्ची-माशी खाल्ली-चावली

## कंटाळा

कंटाळ्याच्या कपाळावर
कायम जाळे आठ्यांचे
कंटाळ्याचे हात-पाय
जणू भिजल्या पुठ्ठ्यांचे

कंटाळ्याच्या जांभयांनी
उत्साहाचा जातो पीळ
बसल्या जागी कंटाळ्याचे
खोल खोल होते बीळ

कंटाळ्याला कंटाळ्याच्या
फांद्या लागतात फुटू
आणि आकाशाचे निळे
जाते मिटू मिटू मिटू



## मी नाही चिक्कट

गोंद म्हणतो, 'मी नाही - चिंगम्सारखा चिक्कट'
चिंगम् म्हणतो, 'मी नाही - भातासारखा चिक्कट'

भात म्हणतो, 'मी नाही - चिकासारखा चिक्कट'
चीक म्हणतो, 'मी नाही - शिरसासारखा चिक्कट'

शिरस म्हणतो, 'मी नाही - गुळासारखा चिक्कट'
गूळ म्हणतो, 'मी नाही - पाकासारखा चिक्कट'

एक म्हणतो, 'मी नाही
दुसऱ्यासारखा चिक्कट'

दुसरा म्हणतो, 'मी नाही
तिसऱ्यासारखा चिक्कट'

तिसरा म्हणतो, 'मी नाही
चौथ्यासारखा चिक्कट'.

एक - दोन - तीन - चार
चिकटुन गेले दर्यापार!



## चालता हो!

सांगायचं सांगून झालं
आता इथे थांबू नको!
लावून पाय कुल्ल्याला
चालता हो. - बोंबू नको!

काय पडणार आहे फरक,
सांगून तेच तेच तेच?
तोच पाय, तोच दगड
पुन्हा पुन्हा तीच ठेच!

घरी जा. - कोपऱ्यात बस्
आणि हव्वा तेवढा रड्
आणि पुन्हा भेटशिल तेव्हा
निमूट माझ्या पाया पड्!



## पावसा पावसा -

पावसा पावसा पाणी दे, पाणी दे
पाणीदार गाणी दे, गाणी दे

पाणी जाईल शेतात - शेतात
दाणा येईल कणसात - कणसात

पाणी जाईल मळ्यात - मळ्यात
रस येईल फळात - फळात

पाणी जाईल तळ्यात - तळ्यात
धार येईल नळात - नळात

पाणी जाईल ढगांत - ढगांत
ढोल वाजेल नभात - नभात

पाणी जाईल पोटात - पोटात
शिंक येईल नाकात - नाकात



## आला पहिला पाऊस

आला पहिला पाऊस
आला वाजत गाजत
आत्ता होता आभाळात
आत्ता आला अंगणात

ढगांवर ढग - ढग
आदळती थडाथडा
आणि मधूनच विजा
झकाकती कडाकडा

इथे-तिथे, खाली-वर
वारा फरारे सणाणा
आणि दर्यात लाटांनी
वेडा घातला धिंगाणा

अशा वातावरणात
आला पहिला पाऊस
आला वाजत गाजत
आणि घालीत धुडगूस

पावसात या पहिल्या
चला भिजू या सगळे
पाहतील आपल्याला
मोरपिसाऱ्याचे डोळे!!



# भोपळा

लाल् लाल् भोप्ळा
आत्ताच काप्ला होऽ
राऽगळा खप्ला
इतकुसा उरला होऽ

भोप्ळा घ्या आजी
करून खा भाजी होऽ
खाताना काढाल्
आठवण माझी होऽ

भोप्ळ्याच्या बिया
कुंडीमध्ये पेरा होऽ
वेलावर येतील
भोऽपळे तेरा होऽ

तेराव्या भोपळा
आजी जर खाल् होऽ
तर तुम्ही पुन्हा
लहानच व्हाल् होऽऽऽ





# मी - तू - तो

मी फोडतो फणस
तू फोड कलिंगड
-त्याला मात्र बसु दे फोडत
दगड दगड दगड

मी घालतो बर्म्युडा
तू घाल लेंगा
-त्याला मात्र तसाच् राहू दे
नंगापंगा नंगापंगा

मी बसतो हत्तीवर
तू बस घोड्यावर
-त्याला मात्र खुश्शाल बसु दे
लंगडणाऱ्या गाढवावर

मी जातो मिरवत मिरवत
तू जा हसत हसत
-त्याला मात्र असाच् जाऊ दे
रडत रडत, डोळे पुसत







## जेव्हा - - तेव्हा

घड्याळात जेव्हा
वाजतात तेरा- -
तेव्हा
हत्तीला बांधून ठेवण्यासाठी
उंदीर करू लागतात
वाळूपासून दोरा!

आठवड्याचे दिवस जेव्हा
खरोखरच होतात आठ- -
तेव्हा
ससा वाघाला सांगतो
''जपून राहा, बिट्टू
माझ्याशी आहे गाठ!''

फेब्रुवारी महिन्यात जेव्हा
येतात दिवस तीस-एकतीस
तेव्हा
कावळ्याच्या डोक्यावर
दिसू लागते मोरपीस!

वर्षात येतात जेव्हा
दोन-चार अधिक महिने
तेव्हा
बेडूक बुलबुलाला
शिकवू लागतो गाणे!

## एखादा मासा -

एखादा मासा
एवढा प्रचंड असतो
की कधी कधी तो
अख्ख्या दोन आगबोटी
आपल्या एकेका गालफडात
खुश्शाल ठेवून देतो!

एखादा मासा
इतका चिमुकला असतो
की खसखशीचा एक दाणा
जरी त्याने खाल्ला-
तरी त्याला मोठ्ठा, न थांबणारा
ठसका लागतो!

एखादा मासा
अस्सा चपळ असतो
की कधी कधी तो
पोहोता पोहोता
आपली शेपटी
आपल्याच तोंडापुढे आणतो!



## माझं स्वप्न

तेरवा रात्री
माझ्या स्वप्नात
आली होती
सचिन तेंडुलकरची बॅट्

- मग सगळ्या
शत्रूंचा मी
केला नाय्नाट्!

परवा रात्री
माझ्या स्वप्नात
आला होता
कपिलदेवचा चेंडू

- तेव्हा माझे
शत्रू म्हणू लागले
आपण खेळू विटी-दांडू!

काल रात्री
माझ्या स्वप्नात
आला होता
महम्मद अझरुद्दीन

- तेव्हा वाटलं
आता तर मी
वारासुद्धा पकडीन्!



## खत्रूडराव नाकउडवे

खत्रुडराव नाकउडवे
नाक उडवत उडवत
म्हणायचे,
'त्या गावसकरला
स्ट्रेट ड्राइव्ह
का नाही कोणी शिकवत ?'

खत्रुडराव नाकउडवे
नाक उडवत उडवत
म्हणायचे,
'त्या कपिलदेवला
आऊट स्विंगर
का नाही कोणी शिकवत ?

खत्रुडराव नाकउडवे
नाक उडवत उडवत
म्हणायचे,
'त्या अझरूद्दीनला
कॅचिंग-फिल्डिंग
का नाही कोणी शिकवत ?'

खत्रुडराव नाकउडव्यांच्या
खत्रुड नाकावरती
चेंडू बसला
- बरे झाले
वरचे नाक आले खालती !

## क्रिकेट

जिंकू किंवा हरू
जिंकू किंवा हरू
परंतु खेळ चांगला करू

क्रिकेट हा खेळांचा राजा
त्याला मुजरा करू ।।धृ. ।।

अकरा इकडे - अकरा तिकडे
खेळाडू जणु वीर फाकडे
सज्ज जाहले परजुनी शस्त्रे

युद्ध होतसे सुरू ।।१ ।।

एकापाशी चेंडू मारक
दुसऱ्याहाती फळी प्रतिकारक
मैदानी नाटकमंचावर

रंग लागतो भरू ।।२ ।।



कधी विजय अन् कधी पराजय
क्वचित् कधी होईना निर्णय
निकाल पंचांचा आम्ही हो-

हसतमुखे पत्करू ।।३ ।।

खेळ नसे हा, हे तर जगणे
लढणे, लढणे, आणखी लढणे
खेळ जगवण्यासाठी असला

सर्वस्वार्पण करू ।।४ ।।





# आमची इतर प्रकाशने

एका सायकिॲट्रीस्टची डायरी
- डॉ. आनंद नाडकर्णी — रु. ४५/-

ॲडम - रत्नाकर मतकरी — रु. १२५/-

सुनील - संपादक : संजय कऱ्हाडे — रु. २२५/-

पुरुषांची गोष्ट - अरविंद गोखले — रु. १००/-

स्त्री जन्मा - अरविंद गोखले — रु. १००/-

अटक मटक
चिंकू टिंकू
जंगलजत्रा
बेटावरचे बहाद्दर
तीन कलंदर बडे बिलंदर
- वृंदा लिमये — रु. २५/- प्रत्येकी

अयोध्या विवाद : एक सत्यशोधन
- प्रा. शेखर सोनाळकर — रु. १५०/-

कुमार - वसंत पोतदार — रु. १२५/-

तेजाची पाऊले - फा. फ्रान्सिस दिब्रिटो — रु. ४५/-